**पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील १२ अस्थायी पदांना दिनांक ०१ मार्च, २०२३ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२३ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांक : आस्था २०१६/प्र.क्र. १०८/पापु-०१

गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत, ७ वा मजला, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
दिनांक : २८ फेब्रुवारी, २०२३.

<u>वाचा :-</u>

१) शासन निर्णय क्रमांकः पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आढावा १००१/ प्र.क्र. ६२८/पापु-०१, दिनांक ४ सप्टेंबर, २००२.
२) शासन निर्णय क्रमांकः पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आस्था २०१६/ प्र.क्र. १०८/पापु-०१, दिनांक १२ मार्च, २०२०.
३) शासन निर्णय क्रमांकः पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आस्था २०१६/ प्र.क्र. १०८/पापु-०१, दिनांक १६ सप्टेंबर, २०२०.
४) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क. दिनांक १५ फेब्रुवारी, २०२१.
५) शासन निर्णय क्रमांकः पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आस्था २०१६/ प्र.क्र. १०८/पापु-०१, दिनांक २६ फेब्रुवारी, २०२१.
६) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क. दिनांक १० ऑगस्ट, २०२१.
७) शासन निर्णय क्रमांकः पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आस्था २०१६/ प्र.क्र. १०८/पापु-०१, दिनांक ३० ऑगस्ट, २०२१.
८) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क. दिनांक २२ फेब्रुवारी, २०२२.
९) शासन निर्णय क्रमांकः पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आस्था २०१६/ प्र.क्र.१०८/पापु-०१, दिनांक ०२ मार्च, २०२२.
१०) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क. दिनांक १८ ऑगस्ट, २०२२.
११) शासन निर्णय क्रमांकः पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आस्था २०१६/ प्र.क्र.१०८/पापु-०१, दिनांक ३० ऑगस्ट, २०२२.
१२) शासन शुध्दीपत्रक पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आस्था २०१६/ प्र.क्र.१०८/पापु-०१, दिनांक ३० ऑगस्ट, २०२२.
१३) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र. ८/१६/आ.पु.क. दिनांक ०८ फेब्रुवारी, २०२३.

**प्रस्तावना :-**

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या उक्त वाचा क्रमांक १ येथील दिनांक ४ सप्टेंबर, २००२ रोजीच्या शासन निर्णयान्वये पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील (खुद्द) पदांबाबतच्या आढाव्यानुसार सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षाकरिता विभागाच्या आकृतीबंधात समाविष्ट असणाऱ्या १२ अस्थायी पदांना उक्त वाचा क्रमांक २ येथील दिनांक १२ मार्च, २०२० व दिनांक १६ सप्टेंबर, २०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये १ मार्च, २०२० ते दिनांक २८ फेब्रुवारी, २०२१ पर्यंत, वाचा क्रमांक ५ येथील दिनांक २६ फेब्रुवारी, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक १ मार्च, २०२१ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२१, वाचा क्रमांक ७ येथील दिनांक ३० ऑगस्ट, २०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक १ सप्टेंबर, २०२१ ते दिनांक २८ फेब्रुवारी, २०२२ पर्यंत, वाचा क्र.९ येथील दिनांक ०२ मार्च, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१ मार्च, २०२२ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२२ पर्यंत, तसेच, वाचा क्र.११ व १२ येथील दिनांक ३० ऑगस्ट, २०२२ रोजीच्या शासन निर्णय व शासन शुध्दिपत्रकान्वये दिनांक ०१ सप्टेंबर, २०२२ ते दिनांक २८ फेब्रुवारी, २०२३ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजुरी देण्यात आलेली आहे.

०२. उक्त वाचा क्रमांक १३ येथील वित्त विभागाच्या दिनांक ०८ फेब्रुवारी, २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापुर्वी आढावा मंजुर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा आकृतीबंधात समावेश करण्यात आलेला नाही अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१ मार्च, २०२३ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आलेले आहेत. त्यानुषंगाने पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील १२ अस्थायी पदांना पुढे चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. ही बाब विचारात घेऊन, शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय :-

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षाकरिता १० अस्थायी पदांची व जागतिक बॅक अर्थसहाय्यित जलस्वराज्य प्रकल्पांतर्गत निर्माण करण्यात आलेल्या २ अस्थायी पदे ही जलस्वराज्य टप्पा-२ कार्यक्रमांतर्गत फक्त कार्यक्रम कालावधीपुरती निर्माण करण्यात आलेली नसून ती विभागाच्या आस्थापनेवरील अस्थायी पदे आहेत.

०२. केंद्र शासन व राज्य शासनाच्या धोरणानुसार पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत पिण्याचे शुध्द व पुरेसे पाणी आणि स्वच्छतेच्या सुविधा उपलब्ध करावयाच्या अनुषंगाने योजनांची अंमलबजावणी करण्यासाठी विभागाला अधिक मनुष्यबळाची आवश्यकता निर्माण झाली आहे. यास्तव

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील १२ अस्थायी पदे पुढे चालू ठेवणे आवश्यक आहे.

०३. सबब, उपरोक्त वाचा क्रमांक १३ येथील वित्त विभागाच्या दिनांक ०८ फेब्रुवारी, २०२३ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार या शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्र अ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील १२ अस्थायी पदांना दिनांक ०१ मार्च, २०२३ ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२३ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

०४. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापेवरील सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षाकरिता १० अस्थायी पदांवर होणारा खर्च मागणी क्रमांक वाय-५, लेखाशिर्ष-३४५१-सेक्रेटरीएट आर्थिक सेवा-०९०-सेक्रेटरीएट (१) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (३४५१ ०४६७) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाच्या मंजुर तरतुदीतून भागविण्यात यावा. तसेच जागतिक बँक अर्थसहाय्यित जलस्वराज्य प्रकल्पांतर्गत निर्माण करण्यात आलेल्या २ अस्थायी पदांच्या वेतन व भत्त्यावरील खर्च हा जलस्वराज्य कार्यक्रमाकरिता भारतीय स्टेट बँक, बेलापूर, बेलापूर शाखा, नवी मुंबई येथील खाते क्रमांक ३१८६८४३४७८१ मधून कार्यक्रम कालावधीपुरता करण्यात यावा.

०५. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या दिनांक ०८ फेब्रुवारी, २०२३ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन घेण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०२२८११४६३२६५२८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY VITHOBA KALBHOR

Digitally signed by SANJAY VITHOBA KALBHOR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=f38e777689de3b7f0254b419127daa9612b470f287aa6310645bf8f39ddb6811, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DF8236826D559FF6F7F76F1D6D59C70C92E9C010F48017078D824BE6D2B5B8D1, cn=SANJAY VITHOBA KALBHOR
Date: 2023.02.28 15:10:32 +05'30'

**( संजय काळभोर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत :-

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
४. उप सचिव, वित्त विभाग (आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई.
५. सह सचिव तथा प्रकल्प संचालक (पापु-११), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
६. अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
७. अवर सचिव / कार्यासन अधिकारी (पापु-०४), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
८. निवडनस्ती (पापु-०१)

## प्रपत्र - अ

शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आस्था २०१६/प्र.क्र. १०८/पापु-०१,
दिनांक : २८ फेब्रुवारी, २०२३ चे सहपत्र.
पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील अस्थायी पदे.

| अ.क्र. | पदनाम | नवीन पदनाम | वेतन बँड + ग्रेड पे | पदसंख्या |
|---|---|---|---|---|
| १ | उप सचिव व संचालक (प्रकल्प व्यवस्थापन कक्ष) | उप सचिव तथा प्रकल्प संचालक (सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष) | ७ वा वेतन आयोग मॅट्रीक्स-४ लेव्हल-११ | १ |
| २ | प्रकल्प अधिकारी | प्रकल्प व्यवस्थापक | रु. १५६००-३९१००+रु.६६०० | १ |
| ३ | उप अभियंता | तांत्रिक अधिकारी | रु. १५६००-३९१००+रु.५४०० | १ |
| ४ | उप लेखापाल | उप लेखापाल | रु. ९३००-३४८००+रु.४२०० | १ |
| ५ | उच्चश्रेणी लघुलेखक | उच्चश्रेणी लघुलेखक | रु. ९३००-३४८००+रु.४४०० | १ |
| ६ | लिपिक-टंकलेखक | लिपिक-टंकलेखक | रु. ५२००-२०२००+रु.१९०० | १ |
| ७ | वाहनचालक-नि-सर्वसाधारण सहायक | वाहनचालक-नि-सर्वसाधारण सहायक | रु. ५२००-२०२००+रु.१९०० | २ |
| ८ | शिपाई | शिपाई | रु. ४४००-७४४०+रु.१३०० | २ |
| | **एकुण पदे** | | | **१०** |

| अ.क्र. | पदनाम | वेतन बँड + ग्रेड पे (६ वा वेतन आयोग) | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | अवर सचिव | रु. १५६००-३९१०० + रु. ६६०० | १ |
| २ | सहायक कक्ष अधिकारी | रु. ९३००-३४८०० + रु. ४३०० | १ |
| | **एकुण पदे** | | **२** |

SANJAY VITHOBA KALBHOR

Digitally signed by SANJAY VITHOBA KALBHOR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=f38e777689de3b7f0254b419127daa9612b470f287aa6310645bf8f39ddb6811, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DF8236826D559FF6F7F76F1D6D59C70C92E9C010F48017078D824BE6D2B5B8D1, cn=SANJAY VITHOBA KALBHOR
Date: 2023.02.28 15:11:22 +05'30'

**( संजय काळभोर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**